अधिव्याख्याता, भौतिकशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : ससेनि-३२१८/प्र.क्र.६८/१८/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१८.

**<u>संदर्भ</u>** : १) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.१५/६/२०१७.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५(२)(१४)/१३१३१/सात-अ, दि.१३/४/२०१७ व दि.०५ /०४/२०१८.
३) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्र. ससेनि-३२१७/प्र.क्र.६०/१७/तांशि-७, दि.१८ जुलै, २०१७ व दि.२५ सप्टेंबर, २०१८.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र.०२ येथील दि.१३ एप्रिल,२०१७ च्या पत्रान्वये अधिव्याख्याता, भौतिकशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदासाठी शिफारस केलेल्या २७ उमेदवारांपैकी २१ उमेदवारांना संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती देण्यात आली आहे. परंतु त्यापैकी नियुक्ती न स्विकारलेल्या उमेदवारांऐवजी गुणवत्तेनुसार व प्रवर्गनिहाय प्रतिक्षायादीतून उमेदवारांची शिफारस करण्याबाबत आयोगास कळविण्यात आले होते. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०५ एप्रिल,२०१८ च्या पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सहा उमेदवारांची प्रतिक्षायादीतून शिफारस केली आहे. त्यापैकी सदर पदावर नियुक्ती घेण्यास इच्छुक खालील चार उमेदवारांची त्यांच्या नावासमोर रकाना क्र.०५ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | आयोगग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. पठाण अब्दुल रहमान वाहेद खान | खुला | औरंगाबाद | शासकीय तंत्रनिकेतन, अंबड | -------- |
| २ | श्री.बोदेले धिरज दयाराम | अ.जा | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, गोंदिया | ---------- |

| अ. क्र. | आयोगग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमानुसार वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ३ | श्री.खवळे सुरेंद्र विठ्ठल | अ.जा | पुणे | शासकीय तंत्रनिकेतन, कराड | --------- |
| ४ | श्रीमती देवकर ज्योती वसंत | खुला (महिला) | कोकण-१ | शासकीय तंत्रनिकेतन, पेण | **संगणक हाताळणी प्रमाणपत्र (MS-CIT) सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून.** |

०२. उपरोक्त उमेदवारांना संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्टया शासकीय सेवेकरीता पात्र ठरविले आहे. तशी नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

०३. उपरोक्त उमेदवारांचा चरित्र्य पडताळणी अहवाल व साक्षांकन नमुना पोलीसांकडून प्राप्त झाले असून त्यांच्या विरूद्द कोणताही दंड व शिक्षा असलेबाबतची नोंद आढळून येत नसल्याचे कळविले आहे.

०४. उक्त नमूद ०४ उमेदवारांची अधिव्याख्याता, भौतिकशास्त्र, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमदेवाराची वेतनश्रेणी-१५६००-३९१०० या पे बॅण्ड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२, दि.२०/०८/२०१० मध्ये नमूद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पुरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारक रित्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमदेवारांचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) शिफारसपात्र मागासवर्गीय उमेदवारांचे जाती विषयक दावे, संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्याकडून/ संबंधित प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेण्यात यावेत.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.०७/०८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/०३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ०२ वर्षांच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही, तर उक्त कालावधी संपताच सदर पदावरील त्यांच्या सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७) सदर उमदेवारांची नियुक्ती सरळसेवा प्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमांच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सुट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

८) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन), नियम -१९८१ मधील तरतुदींनुसार निश्चित करण्यात यावे.

**९) परिच्छेद ०१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/प्र.क्र.२०७/कार्य-१२, दि.२८ मे,२०१८ नुसार सदर विहित कालावधीत उमेदवार रूजु झाला नाही तर तो नोकरीची संधी गमावेल व त्याच्या नियुक्ती करिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणा-या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही .**

१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदींनुसार दि. ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. ०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि.१८/०८/२००९ च्या परित्रकात नमूद(i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास नवीन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना लागू ठरतील.

११) सदर उमदेवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१२) उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१३) सदर उमदेवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/ प्र.क्र.२०७/ कार्य-१२, दि.२८ मे, २०१८ नुसार उपरोक्त उमेदवार ज्या दिनांकास रूजु होतील त्या दिनांकास त्यांची ज्येष्ठता निर्धारित केली जाईल. त्यांना मूळ गुणवत्ता यादीनुसार ज्येष्ठतेचे लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

०६. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. प्रस्तुत पदाचा निकाल व शिफारशी हा विविध न्यायालयांमध्ये उमेदवारांकडून दाखल झालेल्या न्यायालयीन प्रकरणांवरील अंतिम आदेशाच्या अधीन करण्यात आला असल्याने सदर पदांच्या नियुक्त्या या न्यायालयीन प्रकरणांच्या अंतिम आदेशाच्या अधिन राहून करण्यात येत आहेत.

०८. उपरोक्तपैकी जे उमेदवार शासकीय सेवेत कार्यरत आहेत त्यांना गोपनिय अहवाल न पाहता नियुक्ती देण्यात येत आहे. सदर उमेदवारांची गेल्या पाच वर्षातील गोपनिय अहवाल तपासण्याची जबाबदारी त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या संस्था प्रमुखांवर सोपविण्यात येत आहे.

०९. हे आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबंधित संस्थाप्रमुखांकडे सादर करावा. संस्था प्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८११२६१४५२११६६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2018.11.26 15:01:16 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित उमेदवार (ई-मेलव्दारे).

**प्रत:**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई,
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे),
३. मा. मंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री उच्च व तंत्रशिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
७. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन,अंबड/गोंदिया/कराड/पेण (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत), (वरील उमेदवारांना रुजु करुन घेताना त्यांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्था प्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे आणि त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटींच्या अधीन राहून केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटींची पूर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना/गोंदिया/सातारा/रायगड (तंत्रशिक्षण संचालनालया मार्फत),
१०. निवड नस्ती (तांशि-७).